कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) संवर्गातून उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदावर पदोन्नती व पदस्थापना देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पीओजी-२०२१/प्र.क्र.१७७ (भाग-२)/सेवा-२**
हुतात्मा राजगुरु मार्ग, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ३०.११.२०२१

## शासन आदेश

सन २०२०-२१ च्या निवडसूचीतील खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा, गट-अ मधील उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावर या आदेशान्वये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून पदोन्नती उपरांत उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावांसमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांचे नांव | वाटप करण्यात आलेला महसुली विभाग | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १. | श्री. दिगंबर धु. पाटील | कोकण-१ | सा.बां. उप विभाग, जव्हार, जि.पालघर |

२. श्री. दिगंबर धु. पाटील, कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना पुढील अटींच्या अधीन राहून उप विभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदावर पदोन्नती देण्यात येत आहे:-

१. पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाजेष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या निर्णयाच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

२. सदर तात्पुरत्या पदोन्नत्या या रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२५.५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर रिट याचिकेत होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहतील.

३. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४. उपरोक्त नमूद अभियंत्याविरूध्द, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम ८ व १० खाली विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित /न्यायालयीन प्रकरण/FIR दाखल नसल्याच्या अटीच्या अधीन राहून सदर पदस्थापना आदेश निर्गमित करण्यात येत आहेत. तथापि, उपरोक्त अभियंत्याच्या विरूध्द या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी/ न्यायालयीन प्रकरण/FIR दाखल असल्यास त्यांच्याबाबतीत हे आदेश आपोआप रद्द होतील.

३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांना विनंती करण्यात येते की, श्री.पाटील, कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना पदोन्नतीचे व सविस्तर नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तात्काळ कार्यमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी रुजू होण्याचे आदेश द्यावेत.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११३०१६३९४४३०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Patil Swati Sachin

Digitally signed by Patil Swati Sachin
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=a08a4a756cd7e1e1ea2a6f91922d10f103cebd44790093322544672eefd3784b, serialNumber=41a9218232bbaea65861213d86d108ea7c48905da5f33dba9c8f6662cb8f9e18, cn=Patil Swati Sachin
Date: 2021.11.30 16:44:48 +05'30'

**( स्वा. स. पाटील )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
३. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर
५. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई पुणे यांचेमार्फत.
११. श्री. दिगंबर धु. पाटील, कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) यांना मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांच्यामार्फत
१२. कार्यासन सेवा-३, आस्थापना- १/३, सेवा-६, संगणक कक्ष, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.